**रिट याचिका क्र.७३६१/२०१८ व रिट याचिका क्र.७३६६/२०१८ प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्याबाबत..**
**श्री.डंबाळे व श्री.मुसळे, कनिष्ठ अभियंता**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः क्र.झेडएनजी-२०१७/प्र.क्र.१२/आस्था-४**

बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: १७ सप्टेंबर, २०१८.

**वाचा:-**

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. झेडएनजी-१०८५/३६४१/ सीआर २७४५ /११, दि.३०.४.१९८५.
२) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्र.झेडएनजी-१०००/प्र.क्र.२६४/आस्था-४, दि.२६.४.२००१
३) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र.झेडएनजी-१००४/प्र.क्र.९९०/आस्था-४, दि. २९.५.२००७.
४) मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट याचिका क्र.७३६१/२०१८ व दि.७३६६/२०१८ मध्ये दिलेले न्यायनिर्णय
५) उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद यांचे दि.०१.०८.२०१६ रोजीचा प्रस्ताव.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.जालना यांचे दि. १७.११.२०१५ रोजीचे आदेश.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.जालना यांचे दि. १५.०६.२०१८ रोजीचे आदेश

**शासन आदेश**

दिनांक २९ नोव्हेंबर, १९८४ च्या शासन निर्णयान्वये तत्कालीन पाटबंधारे विभागाने सेवेत असताना पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांनी अभियांत्रिकी पदवी धारण केल्यास (ए.एम.आय.ई या संस्थेची) त्यांचा ३/८ सेवाकाल सहायक अभियंता श्रेणी-२ (पदवीधर अभियंता) म्हणून गृहित धरुन

त्यानुसार ज्येष्ठतेसाठी मानीव दिनांक देण्याचा निर्णय घेतला. पाटबंधारे विभागाच्या प्रस्तुत निर्णयाच्या अनुषंगाने ग्रामविकास विभागाने देखील संदर्भ क्र .१ येथील शासन निर्णयान्वये, जिल्हा परिषदेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांना ३/८ सेवेच्या लाभाबाबत निर्णय घेतला. तसेच, सदर दिनांक मंजूर करण्याचे अधिकार संदर्भ क्र.२ अन्वये सक्षम प्राधिकारी यांना बहाल केले.

तद्नंतर सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच जलसंपदा विभाग दिनांक १६ जून, १९९६ रोजीच्या सेवा प्रवेश नियमात दुरूस्ती करून सहायक अभियंता श्रेणी-२ हे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्याबाबत तरतुद केली. सदरहू तरतूदीमुळे अशाप्रकारे शासन सेवेत असताना पदवी धारण करणाऱ्या पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांना ३/८ सेवेच्या लाभाची तरतुद देणे बंद केले . त्यामुळे ग्रामविकास विभागाने देखील संदर्भ क्र.३ अन्वये, जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता यांनी सेवेत असताना पदवी धारण केल्यामुळे देण्यात येणारा ३/८ सेवेचा लाभ पुढील आदेश होईपर्यंत बंद केले आहे.

जिल्हा परिषद, जालना यांच्या आस्थापनेवरील श्री .यु.एल.डंबाळे हे दि .१८.२.१९८५ रोजी व श्री.एम.व्ही.मुसळे, शाखा अभियंता हे दि .१९.१.१९८७ रोजी शासकीय सेवेत रूजू झाले. दोन्ही कनिष्ठ अभियंत्यांनी शासकीय सेवेत असताना मराठवाडा विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी मधील पदवी अनुक्रमे दि.९.८.२००६ व दि.२.३.२००७ रोजी उत्तीर्ण केली होती . प्रस्तुत शैक्षणिक अर्हतेमुळे त्यांनी दि.१०.१०.२००६ व दि.२४.७.२००८ रोजीच्या अर्जान्वये, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांना स्थापत्य अभियांत्रिकी मधील पदवी धारण केल्यामुळे प्रचलित शासन निर्णयानुसार ३/८ सेवेचा लाभ मिळण्याची विनंती केली होती . मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांनी संदर्भ क्र.६ येथील दि.१७.११.२०१५ रोजीच्या आदेशान्वये सदर लाभ मंजूर करत असल्याचे आदेश निर्गमित केले.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांनी निर्गमित केलेले आदेश संदर्भ क्र .३ येथील शासन निर्णयाच्या दिनांकानंतर (दि.२९.५.२००७) निर्गमित केले असल्याने शासनाने दिलेल्या निदेशानुसार, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांनी संदर्भ क्र . ७ अन्वये प्रस्तुत आदेश रद्द केले. यास श्री.डंबाळे व श्री.मुसळे, शाखा अभियंता यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे अनुक्रमे रिट याचिका क्र .७३६१/२०१८ व रिट याचिका क्र.७३६६/२०१८ अन्वये आव्हानित केले होते. मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.३०.७.२०१८ रोजी आदेश देतांना, प्रस्तुत प्रकरणी संबंधितांना ३/८ सेवेचा लाभ देण्याबाबत आदेशित केले .

मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, श्री.डंबाळे व श्री.मुसळे, शाखा अभियंता, जिल्हा परिषद, जालना यांनी दि.२९ मे, २००७ रोजीच्या शासन निर्णयापूर्वी अभियांत्रिकी मधील पदवी प्राप्त केल्याने ,

शासन निर्णय दि.२६ एप्रिल, २००१ मधील तरतूदीनुसार ३/८ सेवेचा लाभ प्रदान करण्यात येत आहे. यासंदर्भात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांचे दि .१७.११.२०१५ रोजीचे आदेशान्वये, श्री.डंबाळे यांना सहायक अभियंता श्रेणी -२ या पदासाठी मंजूर करण्यात आलेला दि.२३.७.१९९८ व श्री.मुसळे, यांना दि.१.१०.१९९९ हे मानीव दिनांक निश्चित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१७१११८३५८३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Ramesh Shinde

Digitally signed by Vivek Ramesh Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=98222e73b61528cee875e0cab75e02437703c365921479fb0198fcf43d79d224, serialNumber=3d2f2d59501068679dd214122d63cb4d2d18b76f5a89cae6eca0162ae6701444, cn=Vivek Ramesh Shinde
Date: 2018.09.17 13:26:31 +05'30'

**(वि.र.शिंदे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) , यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
२. उपायुक्त (आस्था.) विभागीय आयुक्त कार्यालय , औरंगाबाद.
३. सहायक निबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांना माहितीस्तव.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
५. श्री.यु.एल.डंबाळे, शाखा अभियंता, जिल्हा परिषद,जालना.
६. श्री.एम.व्ही.मुसळे, शाखा अभियंता, जिल्हा परिषद,जालना.
७. निवड नस्ती (आस्था-४).